**शासनमान्य खाजगी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या "अ" श्रेणीतील भोंडेकर सांस्कृतिक क्रीडा व सामाजिक शिक्षण संस्था, भंडारा संचलीत १) डॉ.बाबासाहेब आंबेडकर निवासी मतिमंद शाळा, मोहाडी, ता.जि.भंडारा व २) स्व.जमनाबाई निवासी मतिमंद शाळा नवेगाव बांध, ता.मोर अर्जूनी, जि.गोंदीया या दोन्ही शाळांना ५०% वरून १००% अनुदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्र.एमआयएस -२०१८/प्र.क्र.४५८/दि.क.१**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- ६ ऑक्टोबर, २०२१.

**<u>वाचा:-</u>** १) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक इडीडी-२००३/प्र.क्र.३४०/भाग-३/सुधार-३, दि.१८ ऑगस्ट,२००४.

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक इडीडी-२०१२/ प्र.क्र. ६७/अ.क.१, दि.८ एप्रिल, २०१५.

३) शुध्दीपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक एमआयएस -२०१६/ प्र.क्र. ६०/अ.क.१, दि.२९ ऑगस्ट, २०१८.

४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक इडीडी-२०१७/ प्र.क्र. १०८/भाग- २/अ.क.१, दि.१८ जानेवारी , २०१८.

५) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक इडीडी-२०१८/ प्र.क्र. ५९ /भाग-२/अ.क.१, दि.४ जुलै, २०१८.

६) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक इडीडी-२०१८/ प्र.क्र. १३८/अ.क.१, दि.६ नोव्हेंबर, २०१८.

**<u>प्रस्तावना :-</u>**

शासनमान्य खाजगी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या अपंगांच्या विविध प्रवर्गातील विशेष शाळा / कर्मशाळांना अनुदान देण्याचा निर्णय वेळोवेळी घेण्यात आला आहे. त्यानुसार सदर शाळांना वेतन, वेतनेत्तर अनुदान आणि निवासी शाळा/कर्मशाळातील विद्यार्थ्यांकरीता परिपोषण अनुदान देण्यात येते. शासनमान्य खाजगी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या "अ" श्रेणीमधील विना अनुदानित, अपंगांच्या विशेष निवासी व अनिवासी १२३ शाळा/कर्मशाळांना अटी/शर्ती तपासणीच्या अधीनतेने अनुदान देण्यास मंत्रीमंडळाची मान्यता प्राप्त झाली होती. त्यानुसार दि.८ एप्रिल,२०१५ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला. तद्नंतर आत्ता शासनमान्य खाजगी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या भोंडेकर सांस्कृतिक क्रीडा व सामाजिक शिक्षण संस्था, भंडारा संचलीत १) डॉ.बाबासाहेब आंबेडकर निवासी मतिमंद शाळा, मोहाडी, ता.जि.भंडारा व २) स्व.जमनाबाई निवासी मतिमंद शाळा नवेगाव बांध, ता.मोर अर्जूनी, जि.गोंदीया या दोन्ही शाळांना ५०% वरून १००% अनुदान मंजूर करणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासनमान्य खाजगी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या "अ" श्रेणीमधील विना अनुदानित, अपंगांच्या विशेष निवासी व अनिवासी १२३ शाळा/कर्मशाळांना अटी/शर्ती तपासणीच्या अधीनतेने अनुदान देण्यास मंत्रीमंडळाची मान्यता प्राप्त झाली होती. त्यानुसार दि.८ एप्रिल,२०१५ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला. शासनमान्य खाजगी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या भोंडेकर सांस्कृतिक क्रीडा व सामाजिक शिक्षण संस्था, भंडारा संचलीत १) डॉ.बाबासाहेब आंबेडकर निवासी मतिमंद शाळा, मोहाडी, ता.जि.भंडारा व २) स्व.जमनाबाई निवासी मतिमंद शाळा नवेगाव बांध, ता.मोर अर्जूनी, जि.गोंदीया या दोन्ही शाळांना ५०% वरून १००% अनुदान देण्याकरीता आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी सदर दोन्ही शाळांना "अ" श्रेणी प्राप्त असल्याची खात्री करुन सदर शाळांना १००% वेतनेत्तर अनुदान मंजूर करण्यात येत आहे. सदरहू संस्थांना वेतन व वेतनेतर अनुदान देण्यासाठी सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक १८ ऑगस्ट,२००४ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या आकृतीबंधानुसार पदनिर्मिती करणे आवश्यक आहे. यास्तव, पदनिर्मितीचा प्रस्ताव वित्त विभाग तसेच, उच्चस्तर समितीच्या मान्यतेकरिता सादर करावा. तसेच सदरहू शाळांमधील प्रवेशितांना प्रचलीत नियमानुसार परिपोषण आणि जागा भाडे प्रतीपूर्तीसाठी दिनांक १ जानेवारी,२०१८ पासून नियमीत अनुदान देण्यास तसेच, दिनांक ८ एप्रिल,२०१५ पासूनचे थकित अनुदान सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करून अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०१३१३२४८०५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH RAMCHANDRA DINGLE

Digitally signed by DINESH RAMCHANDRA DINGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, pseudonym=2097D404DF0287B8EA9B9CB128B351603D2AB8BA, serialNumber=FC344849650CE07C3F9ADC7E2CD4976B2852065E2ACD65F7CEE1828C10091458, cn=DINESH RAMCHANDRA DINGLE
Date: 2021.10.13 13:24:52 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) मा.मंत्री (सामाजिक न्याय),यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद), विधान भवन, मुंबई ४०० ०३२.
४) मा.राज्यमंत्री, (सामाजिक न्याय),यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई४०० ०३२.
५) अपर मुख्य सचिव (सामाजिक न्याय), यांचे स्वीय सहायक, मुंबई ४०० ०३२.
६) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग,नागपूर .
८) जिल्हा समाज कल्याण अधिकारी,जिल्हा परिषद, भंडारा व गोंदिया
९) महालेखापाल, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/नागपूर
११) जिल्हा कोषाधिकारी, भंडारा व गोंदिया
१२) निवडनस्ती / संग्रह नस्ती (दिव्यांग कल्याण -१).